**"महिला व बाल सशक्तीकरण योजनेसाठी" जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत किमान ३% इतका निधी कायमस्वरुपी उपलब्ध करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक - संकीर्ण-२०२०/प्र.क्र.१३१/का-२**
तिसरा मजला, नवीन प्रशासकीय इमारत,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक- ३१ जानेवारी, २०२२.

**संदर्भ :-**

१. शासन निर्णय, नियोजन विभाग क्रमांक-जिवायो १००७/प्र.क्र.३९/का. १४४४. दिनांक १६.०२.२००८.
२. मा.मंत्री (महिला व बाल विकास) यांचे अध्यक्षतेखाली आयोजित दिनांक २३.९.२०२० रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
३. आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांचे पत्र क्र.मबाविआपु/आस्था/मबाविभवन/२०२०-२१, दि.२.११.२०२०.
४. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांचे दि.२६.११.२०२० रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

राज्यातील महिला व बालकांच्या सामाजिक, आर्थिक व शैक्षणिक विकासाकरिता महिला व बाल विकास विभागामार्फत विविध योजना राबविण्यात येतात. तथापि, महिला व बाल विकास विभागास प्राप्त होणाऱ्या नियतव्ययातून प्रत्येक योजनेच्या प्रभावी अंमलबजावणी साठी पुरेसा निधी उपलब्ध करुन देणे शक्य होत नाही. महिला व बालकांच्या सर्वांगिण विकासाशी संबंधित योजना राबविताना जिल्ह्यातील सामाजिक, आर्थिक, भौगोलिक व नैसर्गिक साधनसंपत्ती इ. बाबी विचारात घेऊन स्थानिक परिस्थितीनुसार योजनांची अंमलबजावणी करणे आवश्यक आहे. त्यानुषंगाने राज्यातील महिला व बालकांच्या सर्वांगीण विकासाकरिता प्रत्येक जिल्हयामध्ये महिला व बाल सशक्तीकरण या सर्वसमावेशक योजने (Umbrella Scheme) करीता जिल्हा नियोजन समितीस नियोजन विभागाकडून मिळणाऱ्या एकूण नियतव्ययाच्या किमान ३% इतका निधी कायमस्वरुपी राखून ठेवून योजनेची अंमलबजावणी करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

२. महिला व बाल विकास विभागाला जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत किमान ३% निधी कायमस्वरुपी चिन्हांकीत करुन उपलब्ध करुन देण्याची घोषणा मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे अर्थसंकल्पीय भाषण सन २०२१-२२ मध्ये करण्यात आलेली आहे. या पार्श्वभूमीवर महिला व बाल विकास विभागाने महिला व बाल सशक्तीकरण या सर्वसमावेशक योजनेची (Umbrella Scheme) राज्यात खालीलप्रमाणे अंमलबजावणी करण्याचा निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

महिला व बाल विकास विभागामार्फत महिला व बाल सशक्तीकरण ही सर्वसमावेशक योजना (Umbrella Scheme) राज्यात राबविण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर योजनेकरीता जिल्हा नियोजन समितीस नियोजन विभागाकडून मिळणाऱ्या एकूण नियतव्ययाच्या किमान ३% इतका निधी कायमस्वरुपी राखून ठेवण्यास नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने मान्यता देण्यात येत आहे.

महिला व बाल विकास विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या महिला व बाल सशक्तीकरण ही सर्वसमावेशक योजनेचे (Umbrella Scheme) मुख्य उदिष्ट महिला व बालकांचे सक्षमीकरण करणे असा आहे. महिला व बालकांचे सक्षमीकरण करताना महिला व बाल विकास विभागाच्या जिल्हास्तरीय विविध कार्यालयांना एकाच छताखाली आणणे देखील आवश्यक आहे. त्याकरीता जिल्हाधिकारी यांनी प्राधान्याने जमीन उपलब्ध देणे बंधनकारक राहील. सदर उपलब्ध जमीनीवर प्राधाान्याने महिला व बाल विकास भवनाचे बांधकाम करणे अनिवार्य आहे. सदर महिला व बाल विकास भवनाचे बांधकाम करण्यासाठी राज्यात प्रायोगिक तत्वावर मान्यता देण्यात आलेल्या अमरावती पॅटर्न प्रमाणे बांधकाम करण्यात यावे. सदरील योजनेअंतर्गत राज्यातील निर्माण करावयाच्या महिला व बाल विकास भवन करीता तसेच सदर योजनेत अंतर्भूत असलेल्या अन्य बांधकामासाठीचा निधी जिल्हा नियोजन समितीमार्फत थेट सार्वजनिक बांधकाम विभागास वर्ग करण्यात यावा.

उर्वरित निधी जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांना वर्ग करावा. काही अपरिहार्य कारणांमुळे महिला व बाल भवन बांधणे शक्य नसल्यास त्या आर्थिक वर्षातील किमान ३% जिल्हा नियोजन विकास समिती निधी (DPDC fund) महिला व बाल सशक्तीकरण ही सर्वसमावेशक योजनेतील (Umbrella Scheme) अन्य योजनांसाठी वापरावयाचा असल्यास सर्वसमावेशक योजना (Umbrella Scheme) अंतर्गत "त्रिस्तंभ धोरण (३ Pillar Strategy) मधील उपयोजना क्र."अ" मधील योजना बाबतचे प्रस्ताव जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांनी आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांच्या मान्यतेनंतर जिल्हा नियोजन समितीच्या मान्यतेसाठी सादर करावेत. उपयोजना क्र."ब" मधील योजनांची अंमलबजावणी करताना योजनेतील प्रस्ताव जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांनी व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, मुंबई यांच्या सहमतीने जिल्हा नियोजन समितीच्या मान्यतेसाठी सादर करावेत. तसेच उपयोजना क्र."क" मधील योजनांची अंमलबजावणी करताना योजनेतील प्रस्ताव जिल्हा कार्यक्रम अधिकारी यांनी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांच्या मान्यतेने थेट जिल्हा नियोजन समितीच्या मान्यतेसाठी सादर करावा.

**अ) उपयोजना क्रमांक-अ महिला सबलीकरण व बालकांचा विकास.**

१) जिल्हास्तरावर महिला व बाल भवनाचे बांधकाम करणे.

२) जिल्हा स्तरावर / मोठया धार्मिक स्थळांच्या ठिकाणी शासकीय भिक्षेकरी गृहांचे बांधकाम करणे, अस्तित्वात असलेल्या शासकीय भिक्षेकरी गृहांची दुरुस्ती, बांधकाम व प्रवेशीतांच्या पुनर्वसनासाठी आवश्यक सुविधा निर्माण करणे.

३) जिल्हा व तालुका स्तरावरील महिला व बाल विकास विभागाच्या अधिनस्त असलेल्या शासकीय निरीक्षणगृहे, मुलींची शासकीय वसतीगृहे, महिलांसाठीचे राज्यगृहे, आधारगृहे, संराक्षणगृहे तसेच महिला व बाल विकास विभागाशी संबंधीत गरज असलेल्या इमारतींचे शासन मान्यतेने बांधकाम व दुरुस्ती करणे.

४) जिल्हा व तालुका स्तरावर शासकीय कार्यालये व इमारती मध्ये महिलांकरीता स्तनपानासाठी बंदिस्त कक्षाचे बांधकाम करणे.

५) ग्राम / नागरी / प्रभाग / तालुका स्तरावरील बाल संरक्षण समितीमध्ये एकसुत्रिपणा आणण्याच्यादृष्टीने सदर समित्या सक्षम करण्यासाठी आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांच्या संम्मतीने तरतुद करणे.

६) महिला व बालकांचे कायदे / योजनांच्या प्रसिध्दीसाठी तसेच ग्राम बाल संरक्षण समिती (VCPC) चा विस्तार करण्यासाठी ग्रामपंचायतीच्या मासिक सभेतील कार्यसुचीमध्ये (Agenda) समावेश करणे.

७) देवदासी व त्यांच्या मुलांच्या पुनर्वसनासाठी योजना राबविणे.

८) कोणत्याही कारणामुळे एक पालक किंवा दोन्ही पालक गमावून अनाथ झालेल्या मुलांबाबत शासनाच्या मान्यतेने योजना राबविणे.

९) कोणत्याही कारणामुळे पतीचे/ कर्त्या पुरुषाचे निधन होवून एकल/विधवा झालेल्या महिलांच्या पुनर्वसनाबाबत शासनाच्या मान्यतेने योजना राबविणे.

**ब ) उपयोजना क्रमांक-ब महिलांचे आर्थिक सक्षमीकरण.**

१) महिला बचतगट मोहिमेच्या बळकटीकरणाकरीता जिल्हा व तालुका स्तरावर शासकीय जागेवर किंवा स्थानिक स्वराज्य संस्थाचे जागेवर महिला बचतगट भवनाचे बांधकाम करणे .

२) जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांच्याकरीता प्रत्येक जिल्हयाकरीता वाहने वित्त विभागाच्या प्रचलीत वाहन धोरणानुसार उपलब्ध करुन देणे. सदर वाहन जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांनी महिला बचत गटांचे उत्पादक वस्तुला स्थानिक बाजारपेठ उपलब्ध होण्यासाठी “समुदाय व्यवस्थापित संसाधन केंद्र” (CMRC) करीता महिला आर्थिक विकास महामंडळला (माविम) माल वाहतूकीसाठी आवश्यकतेनुसार उपलब्ध करुन देण्यात येईल.

३) महिला बचत गटांच्या उत्पादक वस्तुला सुलभ प्रकारे विक्री होण्याकरीता राष्ट्रीय व राज्य महामार्ग तसेच मुख्य जिल्हा मार्गाला लागून शासकीय जागेत / स्थानिक स्वराज्य संस्थेच्या जागेत लहान स्टॉल बांधकाम करणे.

**क) उपयोजना क्रमांक-क - एकात्मिक बालविकास सेवा योजना.**

१) अंगणवाडी केंद्रांचे नवीन बांधकाम करणे.
२) अंगणवाडी केंद्रांना नलिकांद्वारे पाणीपुरवठा करणे.
३) अंगणवाडी केंद्रांना वीज पुरवठा करणे.
४) अंगणवाडी केंद्रांतील स्वयंपाकघरांचे आधुनिकीकरण करणे.
५) अंगणवाडी केंद्राच्या इमारतीचे विस्तारीकरण करणे.
६) अंगणवाडी केंद्रांच्या इमारतींची विशेष दुरुस्ती करणे.
७) अंगणवाडी केंद्रांमध्ये मातांच्या स्वतंत्र प्रतिक्षागृहाचे बांधकाम करणे.
८) अंगणवाडी केंद्रांकरीता संरक्षक भिंत बांधणे.
९) वाढ संनियंत्रण संयंत्रांचा पुरवठा व देखभालीसाठी खर्च करणे.

"सर्वसमावेशक योजना (Umbrella Scheme) अंतर्गत "त्रिस्तंभ घोरण (३ Pilar Strategy)" प्रमाणे एकूण २१ नवीन योजना (New Scheme)" राबविण्याकरीता जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत किमान ३ टक्के निधीतून प्राथम्य क्रमाने बांधण्यात येणार आहे. सदर महिला व बाल विकास भवन तसेच सदर निधी अंतर्गत येणारी सर्व बांधकामे ही जिल्हास्तरावरील सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत करण्यात यावीत. सदर बांधकामास प्रशासकीय मान्यता तसेच तांत्रिक मान्यता देण्यास सक्षम प्राधिकारी खालील प्रमाणे राहतील.

| | | |
|---|---|---|
| जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत किमान ३ टक्के निधीतून बांधण्यात येणाऱ्या बांधकामास मंजूरी. | प्रशासकीय मान्यता | तांत्रिक मान्यता |
| | जिल्हाधिकारी. | सार्वजनिक बांधकाम विभागातील सक्षम प्राधिकारी |

१) सदर योजनेतील महिला व बाल भवन बांधकामा संदर्भातील प्रशासकीय व तांत्रिक मान्यतेबाबतचे सर्व प्रस्ताव वरील तक्त्यात नमूद केल्यानुसार जिल्हाधिकारी तसेच सार्वजनिक बांधकाम विभागातील सक्षम प्राधिकारी यांच्यामार्फत सादर करण्यात यावेत.

२) सर्वसमावेशक योजना (Umbrella Scheme) अंतर्गत "त्रिस्तंभ धोरण (३ Pillar Strategy) मधील उपयोजना क्र."अ" मधील योजना बाबतचे प्रस्ताव जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांनी आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांच्या मान्यतेनंतर जिल्हा नियोजन समितीच्या मान्यतेसाठी सादर करावेत. उपयोजना क्र."ब" मधील योजनांची अंमलबजावणी करताना योजनेतील प्रस्ताव जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांनी व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, मुंबई यांच्या सहमतीने जिल्हा नियोजन समितीच्या मान्यतेसाठी सादर करावेत. तसेच उपयोजना क्र."क" मधील योजनांची अंमलबजावणी करताना योजनेतील प्रस्ताव जिल्हा कार्यक्रम अधिकारी यांनी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांच्या मान्यतेने थेट जिल्हा नियोजन समितीच्या मान्यतेसाठी सादर करावा.

३) महिला व बालविकास विभागाच्या "सर्वसमावेशक योजना (Umbrella Scheme)" अंतर्गत "त्रिस्तंभ धोरण (३ Pillar Strategy)" प्रमाणे सदर योजनेतील एकूण २१ "नवीन योजना (New Scheme)" राबविण्याकरीता येणारा खर्च नियोजन विभागाच्या कार्यक्रम खर्च (Scheme Expenditure) मागणी क्रमांक ओ-१४ ते ओ ८५ अंतर्गत उपलब्ध होणाऱ्या अर्थसंकल्पीत नियतव्यय (Budget Outlay) मधून प्रत्येक आर्थिक वर्षात करण्यात यावा.

४) सदर योजनेच्या अंमलबजावणी बाबतच्या मार्गदर्शक सूचना (Implementation Guidelines)" स्वतंत्र परिपत्रकाद्वारे निर्गमित करण्यात येतील.

४. सदर शासन निर्णय नियोजन विभाग अनौपचारीक संदर्भ क्रमांक-.४७३, दिनांक.२१.१०.२०२१ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक-४३१/२०२१/व्याय, दिनांक.०३.११.२०२१ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२२०१३११५११५०५३३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VARUDKAR MAHESH ASHOKRAO

Digitally signed by VARUDKAR MAHESH ASHOKRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d93c4961d98086877a4048296211d7af97ecfd40d7967c43d20b360d83ce0fa6, pseudonym=58C42BF9F3ABBB1C15CFBC42D0AA8503E42564DB, serialNumber=7EBBBC3712E8D459EF90BF7AAE4EA46E9CAEBDD50CFECDE2EE7CE0454FA0416A, cn=VARUDKAR MAHESH ASHOKRAO
Date: 2022.01.31 15:13:26 +05'30'

**( महेश वरुडकर )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई

२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष/ सदस्य, विधानसभा/ विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई
५. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/ विधानपरिषद, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. मा.मंत्री, नियोजन/ वित्त विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७. मा.मंत्री/ मा.राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
८. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
९. सर्व विभागांचे अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई
१०. प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
११. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई
१२. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे
१३. सर्व जिल्हाधिकारी
१४. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
१५. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर
१६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१७. उपायुक्त (महिला विकास)/ (बाल विकास), महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे
१८. सर्व जिल्हा कार्यक्रम अधिकारी (महिला व बाल विकास), जिल्हा परिषद
१९. सर्व विभागीय उप आयुक्त, महिला व बाल विकास (आयुक्तालयामार्फत)
२०. सर्व जिल्हा महिला व व बाल विकास अधिकारी (आयुक्तालयामार्फत)
२१. निवड नस्ती, का- २.